महाराष्ट्र विकास सेवा गट-ब मधील
अधिकाऱ्यांना महाराष्ट्र विकास सेवा
गट-अ मध्ये तात्पुरती पदोन्नती.

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
## शासन आदेश क्रमांकः मविसे १०/प्र.क्र.२८२ (भाग-१)/२०१२/आस्था-३,

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई - ४०० ००१.
तारीख : २५ ऑगस्ट, २०१४.

**संदर्भ-** १) शासन आदेश, ग्राम विकास व जलसंधारण विभाग , क्र.मविसे-१०१४/प्र.क्र.५६/२०१४/आस्था-३, दिनांक ३०.७.२०१४.

२) शासन आदेश, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र. मविसे-१०१४/ प्र.क्र.५६/२०१४/आस्था-३, दिनांक २५.८.२०१४.

**शासन आदेश-**

महाराष्ट्र विकास सेवा गट-ब मधील अधिकाऱ्यांना महाराष्ट्र विकास सेवा गट-अ या संवर्गात पीबी-३ वेतनश्रेणी रुपये १५६००-३९१०० ग्रेडवेतन ५४०० या वेतनश्रेणीत या आदेशान्वये तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नतीने नियुक्ती देण्यात येत आहे. तात्पुरत्या पदोन्नतीनंतर त्यांची पदस्थापना पुढीलप्रमाणे करण्यात येत आहे :-

| अ. क्र. | नाव, सध्याचे पदनाम व ठिकाण | तात्पुरत्या पदोन्नतीनंतरच्या पदस्थापनेचे पदनाम व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| १ | २ | ४ | ५ |
| **१** | श्री.डी.एम. वैरागडे, सहायक गट विकास अधिकारी, पंचायत समिती मूल, जि.चंद्रपूर | गट विकास अधिकारी, पंचायत समिती कोरची, जि.गडचिरोली | श्री.एस.एच. आडे यांच्या संदर्भाधीन क्र.१ येथे नमूद दि.३०.७.२०१४ च्या आदेशान्वये ग.वि.अ. पं.स. कोरची, जि.गडचिरोली येथे तदर्थ पदोन्नतीने दिलेल्या पदस्थापनेत संदर्भाधीन क्र.२ येथे नमूद दि.२५.८.२०१४ च्या आदेशान्वये अंशत: बदल करुन रिक्त झालेल्या जागी. |

| अ. क्र. | नाव, सध्याचे पदनाम व ठिकाण | तात्पुरत्या पदोन्नतीनंतरच्या पदस्थापनेचे पदनाम व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| २ | श्री.वाय.एफ. मोटघरे, सहायक गट विकास अधिकारी (प्रशासन), विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर. | गट विकास अधिकारी, पंचायत समिती सेनगांव, जि.हिंगोली | रिक्त पदावर |

२. वरील अधिकाऱ्यांना देण्यात आलेली तात्पुरती पदोन्नती ही खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

अ) पदोन्नतीच्या कोटयातील पदावर देण्यात येत असलेली पदोन्नती तात्पुरत्या स्वरूपाची असून, ती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

ब) सदर पदोन्नती शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक : एसआरव्ही १०८७/ २००/प्र.क्र.३/८७/१२, दिनांक ८.१०.१९९० मधील तरतुदीच्या अधीन राहील.

क) सदर तात्पुरती पदोन्नती ही जे अधिकारी ज्येष्ठ आहेत, परंतु ज्यांची प्रकरणे विचारार्थ खुली ठेवण्यात आलेली आहेत, अशा अधिकाऱ्यांच्या ज्येष्ठतेस बाधा न आणता देण्यात येत आहे.

ड) सदर तात्पुरती पदोन्नती ही मुंबई उच्च न्यायालयातील याचिका क्रमांक ८४५२/२००४ मध्ये होणा-या निर्णयाच्या अंतिम निकालाच्या अधीन राहील.

इ) सदर तात्पुरती पदोन्नती ही त्यांच्या वयाच्या ५०/५५ व्या वर्षानंतर पुनर्विलोकन करावयाच्या शासन निर्णयाच्या अधीन राहील.

३. तात्पुरत्या पदोन्नतीने नियुक्ती देण्यात आलेल्या पदोन्नत अधिकाऱ्यांनी त्यांच्या नियुक्तीचे आदेश प्राप्त झाल्यापासून सात दिवसाच्या आत हजर होणे आवश्यक आहे. त्याप्रमाणे ते विहीत मुदतीत नियुक्तीच्या ठिकाणी हजर झाले नाहीत, तर त्यांना नियुक्ती नको असे समजून, शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: एसआरव्ही १०८७/११३१/प्र.क्र.११/८९/१२, दिनांक ३०.४.१९९१ मधील तरतुदीनुसार त्यांच्या तात्पुरत्या पदोन्नत्या रद्द करण्यात येतील.

४. संबंधित विभागीय आयुक्त /मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांनी तात्पुरत्या पदोन्नतीने नियुक्ती देण्यात आलेल्या अधिकाऱ्यांना स्थानिक पर्यायी व्यवस्था करुन, तात्काळ कार्यमुक्त करावे आणि नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ हजर होण्याबाबत संबंधितांना सूचना दयाव्यात. तसेच संबंधित कर्मचाऱ्यांनी पदभार स्वीकारल्यानंतर त्याचा अहवाल शासनास सादर करावा.

५. तात्पुरत्या पदोन्नतीने नियुक्ती दिलेल्या पदोन्नत अधिकाऱ्यांनी त्यांच्या नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे त्यांनी अनधिकृतरित्या रजेवर जाऊ नये. यासंदर्भात त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभाग परिपत्रक क्रमांक सीडीआर १०८२/२५६७/२८/११, दिनांक ३०.८.१९८२ अन्वये दिलेल्या सूचनांकडे वेधण्यात येत आहे. तसेच नियुक्ती रद्द करणेसाठी कुठल्याही स्वरुपाचे आवेदन करु नये. तसे केल्यास सदर कर्मचारी शिस्तभंगाच्या कारवाई पात्र ठरतील याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२२१८४०२८७९२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bandekar-
Deshmukh
Sarita Rishi

Digitally signed by Bandekar-Deshmukh Sarita Rishi
DN: CN = Bandekar-Deshmukh Sarita Rishi, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = RDD
Reason: I am approving this document
Date: 2014.08.25 21:22:19 +05'30'

( सरिता बांदेकर-देशमुख )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने )
२. सर्व विभागीय आयुक्त.
३. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
४. सर्व मुख्य लेखा व वित्त अधिकारी जिल्हा परिषद.
५. संचालक, एकात्मिक बाल विकास सेवा योजन संचालनालय, नवी मुंबई.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ / २, मुंबई / नागपूर.
७. खाजगी सचिव, मा. मंत्री, (ग्राम विकास )
८. खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री, (ग्राम विकास )

९. मा.प्रधान सचिव (ग्राम विकास व पंचायत राज ) यांचे स्वीय सहायक
१० संबंधित अधिकारी (द्वारा : मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद)
११. सामान्य प्रशासन विभाग, (कार्यासन-१२/कार्यासन-१६ब), मंत्रालय, मुंबई
१२. कार्यासन क्रमांक आस्था-२, ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१३. कार्यासन क्रमांक आस्था-३अ, ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१४. निवड नस्ती, का.क्र. आस्था-३, ग्राम विकास व जलसंधारण विभाग